**बालकाचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ अनुसार प्राथमिक शिक्षकांकरीता (इ. १ ली ते ८ वी) शिक्षकांकरीता शिक्षकांची शैक्षणिक व व्यावसायिक आणि शिक्षक पात्रता परिक्षा अनिवार्य करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: विभशा-२०१८/प्र.क्र.२२४/विजाभज-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : २३ ऑगस्ट,२०१८

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने भारतीय राज्य घटनेत सन २००२ मध्ये दुरस्तीकरुन ६ ते १४ वयोगटातील सर्व बालकांना मोफत व सक्तीचे प्राथमिक (इ. १ ली ते ८ वी) शिक्षण त्यांचा मुलभूत अधिकार केला आहे. त्या अनुषंगाने केंद्र शासनाने बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ पारित केला आहे. त्याची अंमलबजावणी दि. ०१.०४.२०१० पासून राज्यात सुरु केली आहे. मा. सर्वोच्च न्यायालयाने दि. १२.०४.२०१२ रोजी हा कायदा वैध ठरविला आहे. त्यामुळे या अधिनियमातील तरतूदीची अंमलबजावणी करण्यासाठी राज्य शासनाने बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार नियम, २०११ अधिसूचित केला आहे. बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील कलम - २ (एफ) नुसार इ. १ ली ते ८ वी पर्यंतचे शिक्षण हे प्राथमिक शिक्षण समजले जाणार आहे.

२. केंद्र शासनाने दि. ३१.०३.२०१० च्या अधिसूचनेव्दारे प्राथमिक शिक्षक पदावर नियुक्तीसाठी पात्रता व सेवाशर्ती ठरविण्याकरीता कलम - २३ नुसार राष्ट्रिय शिक्षक शिक्षण परिषद यांना शैक्षणिक प्राधिकरण घोषित केले आहे. त्यामुळे **राष्ट्रिय शिक्षक शिक्षण परिषद** यांनी दि. २३.०८.२०१० व दि.२९.०७.२०११ च्या अधिसूचनेव्दारे प्राथमिक शिक्षकांकरीता (इ. १ ली ते ८ वी साठी) किमान शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता निश्चित केली असून शिक्षक पात्रता परिक्षा (Teachers Eligibility Test) अनिवार्य केली आहे. सदरहू कायद्यातील तरतूदीनुसार राज्यामध्ये प्राथमिक शिक्षकांसाठी (इ. १ ली ते ८ वी साठी) किमान शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता आणि शिक्षक पात्रता परिक्षा शालेय शिक्षण विभागाने त्यांच्या दि.१३.०२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये लागू केली आहे. त्यामुळे सदरहू शासन निर्णय राज्यातील विजाभज प्राथमिक आश्रमशाळांना (इ. १ ली ते ८ वी साठी) आणि माध्यमिक आश्रमशाळांना जोडलेल्या उच्च प्राथमिक आश्रमशाळांना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या विभागातर्फे राज्यामध्ये विजाभज प्राथमिक आश्रमशाळा व विजाभज माध्यमिक आश्रमशाळांना जोडून उच्च प्राथमिक आश्रमशाळा चालविण्यात येतात. बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ आणि **राष्ट्रिय शिक्षक शिक्षण परिषद** यांनी दि. २३.०८.२०१० व दि.२९.०७.२०११ च्या अधिसूचनेव्दारे प्राथमिक शिक्षकांकरीता (इ. १ ली ते ८ वी साठी) किमान शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता निश्चित केली असून शिक्षक पात्रता परिक्षा (Teachers Eligibility Test) अनिवार्य केली आहे. ही शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता सन २०१३ पासूनच राज्यातील विजाभज प्राथमिक

आश्रमशाळांना लागू करणे आवश्यक होते. परंतू सदरहू अर्हता राज्यातील प्राथमिक आश्रमशाळातील शिक्षकांना लागू करण्यात आलेली नाही. त्यामुळे सदरहू शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता राज्यातील विजाभज प्राथमिक आश्रमशाळातील शिक्षकांना लागू करणे आवश्यक आहे. ही बाब विचारात घेता शालेय शिक्षण विभागाने बालकाचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ अनुसार प्राथमिक शिक्षकांकरीता (इ. १ ली ते ८ वी) शिक्षकांकरीता शिक्षकांची शैक्षणिक व व्यावसायिक आणि शिक्षक पात्रता परिक्षा अनिवार्य करण्याबाबतचा शासन निर्णय दि. १३.०२.२०१३ रोजी निर्गमित केलेला आहे. सदरहू शासन निर्णय राज्यातील इ. १ ली ते ८ वी पर्यंतच्या विजाभज प्राथमिक आश्रमशाळाना व विजाभज माध्यमिक आश्रमशाळांना जोडून असलेल्या उच्च प्राथमिक आश्रमशाळांना (इ. ५ वी ते ८ वी साठी) सुध्दा लागू राहील. सदरहू शासन निर्णयातील तरतूदीनुसार यापुढे राज्यातील इ. १ ली ते ८ वी पर्यंतच्या विजाभज प्राथमिक आश्रमशाळांमध्ये व विजाभज माध्यमिक आश्रमशाळांना जोडून असलेल्या उच्च प्राथमिक आश्रमशाळांमध्ये (इ. ५ वी ते ८ वी साठी) प्राथमिक शिक्षकांची भरती करताना संबंधित शिक्षकाकडे शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता असणे आणि शिक्षक पात्रता परिक्षा उत्तीर्ण होणे पूर्वलक्षी प्रभावाने बंधनकारक करण्यात येत आहे.

२. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१८०८२४१५१२५२४७२२ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2018.08.24 15:14:41 +05'30'

**(भा.र. गावित)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
६. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण विभाग.
९. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण.
१०.निवडनस्ती, विजाभज-२.